
सिल्वी व्याल्याल
यूस्सिकेचे
सात मित्र



सिल्वी व्याल्याल

# यूस्सिकेचे सात मित्र

अनुवाद-अनिल हवालदार

कोणे एके काळी यूस्सिके नावाचा एक छोटा मुलगा रहात होता. त्याला रविवार भारी आवडायचा. कोणतीही काळजी न करता अगदी सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यादिवशी मनसोक्त खेळता येत असे. असा दिवस नेहमीच उजाडावा असे यूस्सिकेला वाटे. एक दिवस त्याने ठरवले की, रविवार ज्या देशात राहतो तेथ आपण जायचे आणि त्याला दररोज ये म्हणून सांगायचे.

सूर्य प्रत्येक दिवशी जेथे मावळतो त्या जंगलाच्या पलीकडे आठवड्याचे सर्व दिवस राहतात अशी यूस्सिकेची समजूत होती. त्याला असे वाटले त्याचे कारण तो सकाळी झोपेतून उठायचा तेव्हा दरवेळी सूर्य आपल्याबरोबर नवा दिवस आणायचा.



म्हणून यूस्सिके सूर्यापाठोपाठ निघाला. ज्या ठिकाणी सूर्याचे अजिबात दर्शन घडत नव्हते अशा एका अत्यंत दाट जंगलात तो जाऊन पोहोचला. सूर्याला गाठण्यासाठी यूस्सिके जास्तीत जास्त वेगाने पळत राहिला, पण ते जंगल अथांग वाटत होते. त्यामुळे अखेरीस सूर्य कुठे लपला हे त्याला समजलेच नाही.





वाटेने चालता चालता तो मुंग्यांच्या एका प्रचंड वारूळाशी येऊन थडकला. काळोख पसरत चालला होता म्हणून मुंग्या सर्व दारे बंद करण्याच्या गडबडीत होत्या.

"हे मुंग्यांनो, रविवार कुठं राहतो तुम्हाला माहीत आहे का?" यूस्सिकेने विचारले.

"जंगलातल्या अनेक रस्त्यांवरून आम्ही भटकलोय, पण रविवार राहतो ती भूमी अजून आम्ही पाहिली नाही," मुंग्या उत्तरल्या. "तुम्ही छोट्या पक्षिणीकडे जा. तिला माहीत असेल कदाचित."

मग यूस्सिके छोट्या पक्षिणीला भेटायला गेला. आपल्या घरट्याच्या काठावर बसून ती आपल्या बाळांसाठी अंगाईगीत गात होती.



"छोट्या पक्षिणी, तू कशी आहेस? रविवार कुठं राहतो तुला ठाऊक आहे का?"

"नाही, मला ठाऊक नाही," छोटी पक्षिणी उत्तरली. "माझ्या बाळांसाठी किडे पकडून आणायला मी दिवसभर जरी इकडेतिकडे उडत असते तरी मी ती भूमी कधी पाहिली नाही. कदाचित त्या मोठ्या ओकच्या झाडावर राहणाऱ्या घुबडाला त्या जागेचा पत्ता माहीत असेल. घुबड शहाणं आहे आणि त्याला सगळं ऐकू येतं नि अंधारातसुद्धा ते पाहू शकतं."

म्हणून यूस्सिके घुबडाकडे आला.

"हे शहाण्या घुबडा, रविवार कुठं राहतो ते मला सांगतोस का?"

घुबड सारा दिवस झोपले होते आणि आत्ता संध्याकाळची वेळ झाल्यामुळे नुकतेच जागे होत होते.

"इथून रविवार खूप दूर अंतरावर आहे," घुबड म्हणाले. "पण तू असाच धीराने पुढे चालत गेलास तर सोमवार नावाच्या जागेशी पोचशील. सोमवार फार उद्योगशील आणि प्रेमळ आहे. तो नक्की तुला रविवारकडे जायचा रस्ता दाखवील."





काही वेळानंतर यूस्सिके सोमवारच्या ठिकाणावर पोचला.

"नमस्ते सोमवार," यूस्सिके म्हणाला. "मला रविवारकडे जायचा रस्ता दाखवशील का?"

"लाडक्या यूस्सिके, तू कसा आहेस?" सोमवार म्हणाला. "रविवार जियं राहतो तियं पोचायला सहा दिवस प्रवास करावा लागतो. मी तुला रस्ता दाखवतो, पण आधी तू मला गवत कापायला मदत कर."

यूस्सिके कबूल झाला. त्यांनी दोघांनी मिळून छान काम केले आणि संध्याकाळपर्यंत गवताच्या चिक्कार पेंढ्या बांधल्या. चांगले काम केल्याबद्दल सोमवारने यूस्सिकेचे आभार मानले व त्याला मंगळवारचा रस्ता दाखवला.

बुस्सिके जेव्हा मंगळवारकडे आला तेव्हा बांधकाम चालू होते त्या जागेकडे मंगळवार निघाला होता.

"नमस्ते मंगळवार! मला रविवारचा रस्ता दाखवतो का?"

"रविवारपर्यंत पोचायला पाच दिवस चालायला लागतं. मी तुला रस्ता दाखवीन, पण त्याआधी मला नवीन बालोद्यान बांधायचं आहे. या कामात तू मला मदत करशील का?"

त्यांनी छानपैकी काम केले व बालोद्यान बांधले. मग मंगळवारने बुस्सिकेला बुधवारचा मार्ग दाखवला.





"नमस्ते बुधवार, मला रविवारचा रस्ता दाखवतो का?"

पण बुधवारसमोर एक तातडीचे काम पडले होते: गोठ्यातून वासरू सुटले होते आणि चारी दिशांना धावत होते.

"या खोड्याळ वासराला पकडायला मला मदत कर," बुधवार म्हणाला, "आणि मग आपण बोलू या."

त्यांनी वासराला चटकन पकडले. बुधवारने यूस्सिकेच्या चपळतेचे कौतुक केले आणि तो म्हणाला:

"रविवारपर्यंत पोचायला चार दिवस चालावं लागेल. तू गुरुवारकडे जाणं बरं, त्याला रस्ता अधिक कोणाला ठाऊक आहे."

गुरुवार जवळच रहात होता. आपल्या घराच्या उंबरठ्याशी तो असा काही उभा होता की, जणू यूस्सिके येण्याची तो वाटच पहात होता.

"नमस्ते यूस्सिके! सर्वांना आनंदानं मदत करणारा तू एक चांगला मुलगा आहेस असं मी ऐकलं. माझ्या भाजीपाल्याच्या वाफ्यातलं तण काढायला आणि माझ्या फुलझाडांना पाणी घालायला मला मदत कर ना!"





पहिल्यांदा हे काम यूस्सिकेला आवडले नाही, पण आभार मानल्याप्रमाणे फुले जेव्हा आपल्या माना डोलावू लागली तेव्हा त्याला वाटले की, बागेत काम करण्यातही गंमत आहे. गुरुवारला हा मदतनीस खूप आवडला. रविवारपर्यंत पोचायला तीन दिवस लागतील असे त्याने यूस्सिकेला सांगितले आणि त्याला निरोप दिला.

लौकरच यूस्सिके शुक्रवारकडे पोचला. शुक्रवार कपड्यांचा भलामोठा ढिगारा धुण्यात गर्क होता. धुण्याच्या यंत्राचा दांडा फिरवायला यूस्सिकेला नेहमीच आवडायचे आणि काही सांगितले नसतानाही त्याने आपण होऊनच शुक्रवारला मदत करायला सुरुवात केली. सारे कपडे त्यांनी चुटकीसरशी धुऊन काढले.



रविवारपर्यंत पोचायला फक्त दोन दिवसांचा पायी प्रवास आहे हे यूस्सिकेला शुक्रवारकडून समजले.

अशा प्रकारे यूस्सिके शनिवारकडे आला. शनिवारसमोर प्रचंड काम पडले होते.

"नमस्ते शनिवार! मला रविवारचा रस्ता दाखवतो का?"



“रविवारला पोचायला फक्त एक दिवसाचा प्रवास करायला लागतो,” शनिवार म्हणाला. “खोल्या साफ करायला आणि न्हाणीघराकडं सर्पण न्यायला तू मला मदत केलीस तर फार बरं होईल. हे एवढं काम आपण पुरं केलं रे केलं की, ताबडतोब रविवारकडे जायला निघू.”

यूस्सिके तात्काळ कामाला लागला आणि लौकरच त्यांनी हे काम संपवले. मग न्हाणीघरात यूस्सिकेने चांगली खसखसून स्वच्छ आंघोळ केली. रविवारला भेटायला जाताना छान स्वच्छ आणि ताजेतवाने असायला पाहिजे होते.



रविवारच्या भूमीत सर्व काही सुंदर होते आणि रविवार सर्वांत सुंदर दिसत होता. लौकरच पाहुणे आले. हे पाहुणे म्हणजे यूस्सिके आधीच ज्यांना भेटला होता ते सर्व आठवडयाचे इतर दिवस होते. रविवारने त्यांचे स्वागत केले व तो म्हणाला की, सबंध आठवडा ज्यांनी काम केले त्यांनाच फक्त त्याच्या भूमीत मजा करता येईल. मग सर्व दिवसांनी एकमुखाने सांगितले की, जर यूस्सिकेने त्यांना मदत केली नसती, तर त्यांचे काम वेळेत पुरे झाले नसते.

यूस्सिकेला हे फार आवडले. पाहुण्यांबरोबर त्यानेही नाच करायला सुरुवात केली आणि दररोज ये असे रविवारला सांगायला तो विसरला. आता आठवडयाचे सर्व दिवस त्याचे मित्र बनले होते.

